दिनांक ०१.११.२००५ पूर्वी पदभरती जाहिरात/ अधिसूचना निर्गमित झालेल्या प्रकरणी शासन सेवेत दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यांनतर रुजू झालेल्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना केंद्र शासनाच्या धर्तीवर जुनी निवृत्ती वेतन योजना लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : आस्थाप-२०२४/१०८६/प्र.क्र.२१५/म-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० मे, २०२५.

**वाचा :-**

(१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.४६/सेवा-४, दि.०२.०२.२०२४.
(२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८/सेवा-४, दि.०२.०५.२०२४.
(३) सिटी सिव्हील कोर्ट, मुंबई यांची दि.१०/०५/२००५ रोजीची प्रसिद्ध जाहिरात.
(४) सिटी सिव्हील कोर्ट, मुंबई यांचे पत्र क्र.C/५८-III/४३८९/२००६, दि.०७.०७.२००६.
(५) शासन आदेश क्रमांक : आस्थाप-२०२४/१०८६/प्र.क्र.२१५/म-१, दि. २०.०१.२०२५.
(६) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : का.९/आस्था-५/जुनी नि.वे.यो./श्रीम.राणे/८६७/२५, दिनांक ०७.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाच्या सेवेत जे अधिकारी/कर्मचारी दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त करण्यात आले आहेत. तथापि, त्यांची पदभरतीची जाहिरात/अधिसूचना दि.०१.११.२००५ पूर्वी निर्गमित झालेली आहे. त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी व अनुषंगिक नियमाच्या तरतुदी लागू करण्यासाठी एक वेळ पर्याय (One Time Option) देणेबाबत निर्णय घेण्यात आला आहे. या निर्णयानुसार, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातील, गट-ब (अराजपत्रित) या संवर्गातील श्रीमती अपेक्षा विलीन राणे, उच्चश्रेणी लघुलेखिका (इंग्रजी) यांचा अर्ज/विकल्प विहित मुदतीत शासनास प्राप्त झाला आहे.

२. सिटी सिव्हील कोर्ट, मुंबई यांचे मार्फत संदर्भ क्र.३ येथे नमूद दिनांक १०.०५.२००५ रोजी लिपिक-टंकलेखक या पदाच्या सरळसेवा भरतीसाठी जाहिरात प्रसिध्द करण्यात आली होती. सदर जाहिरातीस अनुसरुन सिटी सिव्हील कोर्ट, मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०७.०७.२००६ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीनुसार, श्रीमती अपेक्षा विलीन राणे (पूर्वाश्रमीच्या श्रीमती अपेक्षा चंद्रकांत सावंत), लिपिक-टंकलेखक गट-क, या पदावर नियुक्ती देण्यात आली होती.

०३. तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडील पत्र क्र.एएससी-१५०९/८१/प्र.क्र. १६/०९/१४-अ, दि.०४.११.२०१० रोजीचे पत्रान्वये, महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे मंत्रालयीन विभाग व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील उच्चश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) पदावर नियुक्तीसाठी निवड परिक्षा-२००७ मध्ये आयोगाने श्रीमती अपेक्षा चंद्रकांत सावंत यांची प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई येथे उच्चश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) या पदावर नियुक्ती करण्यासाठी शिफारस केली होती. तद्नुसार, प्रिंसिपल जज, सिटी सिव्हील व सेशन कोर्ट, मुंबई यांचे कार्यालयीन आदेश क्र. ७६/२०१०, दि. ३०.११.२०१० अन्वये श्रीमती अपेक्षा चंद्रकांत सावंत यांना प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई येथे लघुलेखक (उच्चश्रेणी) या पदावर रुजू

होण्याकरिता दि. ३०.११.२०१० रोजीच्या आदेशान्वये कार्यमुक्त केले. तसेच प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई यांनी आदेश क्र.का.१/ससा/आस्था-१/अचंसा/७५३८, दि.०१.१२.२०१० अन्वये श्रीमती अपेक्षा सावंत यांना दि. ०१/१२/२०१० रोजी (म.पू.) पासून लघुलेखक उच्चश्रेणी (इंग्रजी) या पदावर रुजू करुन घेतले.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०२.०२.२०२४ व संदर्भ क्र.२ येथील दिनांक ०२.०५.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार श्रीमती अपेक्षा विलीन राणे, (पूर्वाश्रमीच्या श्रीमती अपेक्षा चंद्रकांत सावंत) उच्चश्रेणी लघुलेखिका (इंग्रजी) यांनी विहित कालावधीत म्हणजे दिनांक १३.०२.२०२४ रोजीच्या अर्जान्वये जुनी निवृत्ती वेतन योजना लागू करणेबाबत विकल्प सादर केला. श्रीमती राणे ह्या वित्त विभागाच्या शासन निर्णयात नमूद अटींची पूर्तता करीत असल्याने, त्यांना दिनांक १७.०७.२००६ ते दिनांक ३०.११.२०१० कालावधीतील सिटी सिव्हील कोर्ट, मुंबई येथील लिपिक-टंकलेखक पदावरील सेवा ही नंतरच्या दिनांक ०१.१२.२०१० पासूनच्या प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई येथील उच्चश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) या पदावरील सेवेस जोडून देण्यास संदर्भ क्र.५ येथील शासन आदेशान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सबब, श्रीमती अपेक्षा विलिन राणे, उच्चश्रेणी लघुलेखिका (इंग्रजी) यांना वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०२.०२.२०२४ मधील तरतूदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी व अनुषंगिक नियमाच्या तरतुदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अखत्यारीतील प्रधान मुद्रांक कार्यालयातील श्रीमती अपेक्षा विलीन राणे, उच्चश्रेणी लघुलेखिका (इंग्रजी) यांनी जुनी निवृत्ती वेतन योजना लागू करणेबाबतचा पर्याय विहित मुदतीत सादर केल्याने, त्यांना वित्त विभागाच्या दिनांक ०२.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी व अनुषंगिक नियमाच्या तरतूदी लागू करण्यात येत आहेत.

२. श्रीमती अपेक्षा विलिन राणे, उच्चश्रेणी लघुलेखिका (इंग्रजी) यांना जुनी निवृत्ती वेतन योजना व अनुषंगिक नियम लागू करण्यात येत असल्यामुळे संदर्भिय क्र.१) वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०२.०२.२०२४ व संदर्भिय क्र.२) येथील नमूद दि.०२.०५.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५२०१६१३३४४३१९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRACHI SUBHASH PALAV

Digitally signed by PRACHI SUBHASH PALAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=b12a57f3f1547a8767ce0e7181ecb77647d3da9cac2c120c823eb1b68c07dd43, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5479aef7e1148d256d58123c94081f8b8c9af5cfce5aaf933dfa4dc33e2de372, cn=PRACHI SUBHASH PALAV
Date: 2025.05.20 16:14:49 +05'30'

**( प्राची सुभाष पालव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्रीमती अपेक्षा विलीन राणे, उच्चश्रेणी लघुलेखिका (इंग्रजी) यांना
नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

५. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६. कक्ष अधिकारी (सेवा-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.

९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.

१०. निवडनस्ती म-१ (आस्थापना)